गणपतीची मूर्ति स्थापन केली आणि भक्ति करीत मुख्यांशाने तेथे राहून आपल्या अल्पांशांनी सूर्याचे सारथ्य करू लागला. एकदां तामिस्रासुर या नांवाचा एक राक्षस सूर्याचा ग्रास करून त्याला गिळण्याकरता आला. हा राक्षस सूर्य व छाया यांच्यापासूनच उत्पन्न झाला होता. त्याला सूर्याने अनेक वर दिले. त्याचाच प्रभाव म्हणजे आसुरी मुलाने बापास गिळणे हा होय ! पुढे सूर्याने गणपतीचे स्मरण केल्याबरोबर तो प्रकट झाला आणि तामिस्राचा नाश करून सूर्यास व सर्व जगतास सुख देता झाला,

( विकटचरित्र समाप्त )

# सप्तम खंड

—o—

## [ विघ्नराजचरित्र ]

### मरुतांचा अवतार व इंद्राचे कपट

सूत:– हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु यांचा विष्णूने संहार केला. तेंव्हा दितीला अतिशय दुःख झाले. या दुःखाचा उपशम करण्या- साठी तिने आपल्या पतीची सेवा एकनिष्ठपणाने केली. कश्यप ऋषि (दितीचा पति) प्रसन्न झाल्यावर तिने त्याच्यापाशी असा वर मागितला की, ' मला इंद्रघ्न ( इंद्राला मारील असा ) पुत्र आपल्यापासून प्राप्त

व्हावा!' हे मागणे ऐकून ऋषि फार खिन्न झाला. 'आपला धर्माने चालणारा आणि गुणयुक्त मुलगा जो इंद्र त्याला मारणारा मुलगा ही त्याची सावत्र आई मागते. किती दुष्ट आहे ही!' असा विचार करून त्याने गणपतीचे स्मरण केले 'एक वर्षभर व्रतस्थ रहा म्हणजे तुला हवा तसा मुलगा प्राप्त होईल, व्रतात मात्र कोणत्याही प्रकारे खंड पडूं देऊं नको.' असे त्याने दितीस सांगितले. दितीला गर्भ राहिला. तिनेही आपले व्रत मोठ्या भक्तिने चालविले. इकडे हा कश्यपदितीमधील संभाषणाचा ओघ नारदमुखाने इंद्राला कळला. इंद्राने गणेशाचे स्मरण केले, व आपली सावत्र आई दिति तिची सेवा करण्याकरितां सादर झाला. हेतु हा की, कोठे तरी आपल्यास दितीच्या व्रतांतील छिद्र सांपडावे आणि आपणास या गर्भाची वाट लावतां यावी; नऊ महिनेपर्यंत दितीने आपल्या व्रतांत एकही छिद्र उत्पन्न होऊ दिले नाही. पण तिच्या दुर्दैवाने तिला असा गर्व झाला की, 'माझी सर्व इच्छा बहुतेक सफल झाली. मला नवीन इंद्राची आई होण्याची संधि लवकरच प्राप्त होईल.' या मोहाने ती आपल्यास धन्य मानू लागली. एकदां तिला दिवसाच निद्रेने घेरल्यामुळे तीने दोन्ही गुडघ्यामध्ये डोके ठेऊन घोरत पडली. (आपल्या दोन गुडघ्यामध्ये डोके ठेवणे हे एक व्रतभंगाचे लक्षण आहे.) व्रतस्थ असतांना दिवसा कधीही झोप घेता उपयोगी नाही; झोप घेतली तर व्रतभंग होतो. ही छिद्रे पाहून इंद्राला संधि मिळाली, तो दितीच्या उदरांत शिरला व तेथे जो गर्भ होता तो हातांत घेऊन त्याचे आपल्या वज्राने सात तुकडे केले; तथापि दितोचे तप अति उग्र म्हणून त्या गर्भाचा जीव गेला नाही. तो मोठ्याने आंत ओरडावयास लागला. तेंव्हा इंद्राने पुनः सात सात तुकडे करून त्या गर्भाचे

एकोणपन्नास तुकडे केले; तथापि त्या गर्भाच्या जीवाला धक्का पोहोचला नाही! तो गर्भ ओरडत राहिला व इंद्राला म्हणाला, 'आपण सर्वजण भाऊ ना? आपण परस्परांचे वैर करून एकमेकांचे नुकसान करणे ठीक नाही.' ते वचन ऐकून इंद्र ह्मणाला 'मी वैरभाव टाकून देतो आणि स्वर्गलोकास रहावयास येतो' अशी शपथ वाहा ह्मणजे मी तुह्मास मारणार नाही.' 'ठीक आहे' असे वचन घेऊन इंद्र उदराचे बाहेर आला. त्याचवेळी दितीच्या उदरांतून एकोणपन्नास बालके बाहेर आली. तेंव्हा दितीला आश्चर्य वाटले आणि 'मी एकच मुलगा मागितला. मला इतके जास्त कसे झाले?' असे ती इंद्रास विचारू लागली, इंद्राने उत्तर दिले 'आई तुझे मनोगत जाणूनच मी तुझ्या उदरांत शिरलो आणि या गर्भाचे एकोणपन्नास तुकडे केले, आता मी यांना घेऊन आपल्या लोकात जातो. आई, आपली आज्ञा मला पाहिजे.' हे इंद्राचे सत्य भाषण ऐकून दितीला फार आनंद झाला; आणि तिने त्याला हे त्याचे एकोणपन्नास भाऊ ह्मणजे मरुत यांना घेऊन जाण्याची परवानगी दिली; व ही सर्व हकीकत आपल्या पतीला ह्मणजे कश्यपाला कळवली. कश्यपाने तिला पुष्कळ बोध केला; परंतु कांही एक उपयोग झाला नाही. ऋषीने संसाराच्या दुःखमय स्वरूपाची पुनः ओळख करून दिली. 'तेव्हा चित्ताला शांति कोणत्या उपायाने मिळेल तो उपाय मला सांगा,' अशी तिने पतीला प्रार्थना केली.

## ममासुराचे गर्वहरण

कश्यप ह्मणाले, 'शंकर हा नित्य गणपतिभक्त आहे. एकदा विघ्नेश्वराचे स्मरण करून शंकराने द्विजवेश धारण केला आणि

हिमाचल पर्वतावर आला. नानाप्रकारच्या विद्या व कला यांचे प्रद- र्शन करून शंकराने हिमाचलाला संतुष्ट केले आणि 'तुझी उमा नावाची मुलगी मला दे' अशी मागणी घातली. पर्वताला वाईट वाटले. 'ही मागणी करणारा हा ब्राह्मण अगदी वेडा आहे' असे वाटून हिमाचल रागावलाही. पण उमेने त्या द्विजाचे खरे स्वरूप ओळखले होते. बापालाही तिने शंकरस्वरूपाची ओळख करून दिली. तेंव्हा हिमाचलास फार आनंद झाला आणि शंकराला जांवई करण्याचे त्याने आनंदाने कबूल केले. असो; हे लग्न मोठ्या थाटाचे झाले. पुढे कांही काळ गणपतीची भक्ति केल्यावर पार्वतीला स्कंद या नावाचा एक महापराक्रमी व महागणेशभक्त असा मुलगा झाला. त्याने लौकरच तारकासुराचा वध केला. याप्रमाणे शिव व पार्वती संसार- सुखाचा पूर्ण अनुभव पुष्कळ दिवस घेत राहिली. पुढे पार्वतीला असे वाटले की, आपल्यासारखी धन्य स्त्री कोणी नाही. कारण आपला पति (शंकर) सर्वस्वी आपल्या स्वाधीन आहे. तिच्या सख्याही तिचे कौतुक करीत. एकदा हे असेच भाषण चालले असता पार्वतीला हसू आले. ह्या हंसण्यापासून कामासारखा सुंदर आणि भीमासारखा बळकट असा एक पुरुष निर्माण होऊन त्याने पार्वतीला नमस्कार केला. तूं कोण आहेस असे विचारता 'मी तुझ्या हंसण्यापासून उत्पन्न झालेला तुझा मुलगा आहे. काय करूं ते मला सांग' पार्वतीने त्याचे 'मम' असे नाव ठेविले आणि त्याला सांगितले की, 'तूं गणेश- भजन कर. तुझी ख्याति सर्व विश्वभर होईल व तुझ्या सर्व इच्छा परिपूर्ण होतील.' नंतर तिने त्याला गणेशमंत्राची दीक्षा दिली. ममाने आईचा निरोप घेऊन तपश्चर्या करण्यासाठी अरण्यवास पत्करला. तेथे त्याची व शंबरासुराची गांठ पडली; तेंव्हा शंबराने

त्याला सर्व आसुरी विद्या शिकविल्या आणि त्याला सांगितले की, 'पार्वतीने दिलेल्या मंत्राने गणेशाचे आराधन कर. गणपतीपासून ब्रह्मांडाचे राज्य व तत्त्वे किंवा तत्त्वकार्यें यापासून मृत्यूचा अभाव, हे दोन वर मागून घे आणि मला येऊन भेट.' शंबराच्या उपदेशा-प्रमाणे ममासुराने तपश्चर्या केली. गणेशाची प्रसन्नता मिळविली आणि शंबराने सांगितलेले सर्व वरही मागून घेतले. वरप्राप्ति झाल्यावर ममासुर शंबराला नमस्कार करण्याकरता गेला व त्याला त्याने सर्व वृत्तांत सांगितला. तें ऐकून शंबराला हर्ष झाला व त्याने मोहिनी नावाची आपली मुलगी त्याला दिलीं. नंतर शुक्रसमागम, राज्याभिषेक, राक्षससंमेलन, पृथ्वीविजय, धर्म व अधर्म या नावाच्या दोन पुत्रांची प्राप्ति, इत्यादि सर्व गोष्टी जशा व्हावयाच्या तशा झाल्या. शुक्राने मात्र त्याला उपदेश केला होता की, 'तूं केंव्हाही विघ्नेश्वराचा द्वेष करू नको.' या उपदेशाचा फारसा उपयोग झाला नाही. पृथ्वीमध्ये आपली सत्ता प्रस्थापित केल्यावर ममासुराने, पाताळ व स्वर्ग यांच्यावरहो आपली सत्ता स्थापन केलीं, स्वर्गातील देवांचा पराभव करण्याचे काम लहानसहान नव्हते. शिव, विष्णु, भैरव, सूर्य, स्कंद, वीरभद्र, यम, वरुण इत्यादि देवांनी या युद्धांत अपूर्व पराक्रम केला पण ममासुराच्या सन्मुख ज्या वेळेला शंकरविष्णूंस उभे रहावे लागले, तेंव्हा ममासुराने त्यांचा पराजय केला आणि त्यांस अरण्यांत घालवून दिले. याप्रमाणे त्याने स्वर्गावर आपला अंमल बसविला. पुढे तो स्त्री, मांस व मदिरा यांमध्ये आसक्त झाला, तो इतका की, 'आपण मर्त्य आहो, हे तो विसरला मांसमदिरांचे अतिरिक्त सेवन व स्त्रियांची अमर्याद संगति या क्षीण करणाऱ्या व्यसनापासूनही आपल्या देहाला काही एक इजा होणार नाही, ही समजूत त्याने

दृढ करून घेतली. पुढे त्रैलोक्यात दैवी संपत्तीचा क्षय व आसुरी संपत्ति, आसुरी व्यसने व आसुरी तपश्चर्या यांचा उदय झाला हे सांगण्याचे कारणच नाही. अधर्माचा पूर्ण मध्यान्हकाल आला ह्मणजे धर्मसंस्थापक, परमेश्वराचा अवतार होण्याचा दिवस उगवतो हे केव्हांही विसरता कामा नये. इकडे वनवासांत राहून देवांनी केलेल्या गणेशपूजेने गणपती प्रसन्न झाले. आणि नगरांत राहून राक्षसांनी केलेली विषयसेवा गणपतीच्या क्रोधाला कारण झाली. देवांस गणपति प्रसन्न झाले आणि 'भिऊ नका, ममासुराचा मी वध करतो.' असे देवांस त्यांनी वचन दिले. ही सगळी बातमी ममासुराला दुसऱ्या दिवशी कळली. ममासुराने आपली राक्षसमंडळी जमविली आणि तेथे ठरविले की 'देवांसह गणपतीचा नाश करावयाचा.' राक्षससेना निघणार त्याच्या आदल्या दिवशीच समझौता करण्याकरिता गणपतीने नारदास ममासुराकडे पाठविले.

नारदाने ममासुराला परमेश्वराचे अघटित कर्म-कर्तृत्व, इतर जीवांचे कर्मदासत्व ह्या गोष्टी समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. 'गर्व सोड' ह्मणून सांगितले. गणेशब्रह्मस्वरूपाचे रहस्य व गणेशब्रह्म मिळण्याचे साधन जो गणेशयोग, तो स्पष्ट व स्वच्छपणे सांगण्याचा प्रयत्न केला, पण कांही एक उपयोग झाला नाही. पुढे आकाशवाणीनेही नारदाच्या उपदेशाचे समर्थन केले; तथापि दैत्यांस उमज पडला नाही, याचे मुख्य कारण हे की, त्यांचा युद्धकंडू अद्यापि उपशम पावला नव्हता. असो, दैत्यदानवांचे ह्या वेळीही मोठे युद्ध झाले. शेवटी गणपतीनी आपल्या हातांतील कमल राक्षससैन्यावर फेकले आणि त्याचा जसजसा सुवास सर्वत्र पसरला तसतसे गणेशशत्रु नष्ट व्हावे आणि गणेशमित्र सुखरूप असावे

असा चमत्कार त्या कमळाने घडवून आणला. देवांच्या कमळापुढे आपल्या वज्रप्राय शस्त्राचे काही चालत नाही हे पाहून, ममासुराचा गर्व नाहीसा झाला. त्याला पश्चात्ताप झाला, त्याच्या अंतःकरणांत गणेशभक्ति उत्पन्न झाली, आणि त्याला शांति हवीशी वाटूं लागली. नंतर त्याने एक करुणापर स्तोत्र मोठ्या भक्तिने साष्टांग प्रणिपात करून म्हटले आणि त्यांनी दिलेले वर घेऊन तो शांत झाला. गणपतीनी त्याला प्रसन्न झाल्यावर आज्ञापिले की, जेथे आरंभी 'माझे भजन किंवा पूजन होत नाही तेथे तुला विघ्ने उत्पन्न करण्याची पूर्ण मोकळीक आहे. माझ्या भक्तांना मात्र तूं कोणत्याही प्रकारचा त्रास देऊं नको.' ही आज्ञा पाळण्याचे कबूल करून ममासुर स्वस्थानी गेला, राक्षस पाताळांत गेले आणि परमेश्वराची स्तुति करून देवही आपापल्या स्थानी जाण्यास निघाले. जाण्यापूर्वी हिमाचलावर उत्तरेकडे भाद्रपद शुद्ध चतुर्थीच्या दिवशी सांग व सपरिवार गणेशमूर्ति स्थापन करून नित्य भजनपूजन चालू राहील आणि वार्षिक यात्रा व वार्षिक उत्सव निर्विघ्नपणाने चालतील अशी व्यवस्था केली व मग आपण निघून गेले.

## गणेश हेच सर्वश्रेष्ठ ब्रह्म

सूत :– नंतर कश्यपाने असत्, सत्, सदसत्, सद्सद्भाव इत्यादि ब्रह्मांची स्वरूप रचना व स्थूल आणि सूक्ष्म सृष्टीची रचना समजेल अशा रीतोने सांगितली. हीच व्यवस्था पूर्वी विष्णुरूपी गणेशाने सृष्टीची रचना करणाऱ्या देवांस सांगून त्यांच्या अंतः-करणात आनंदाची वृत्ति उत्पन्न केली होती. कश्यप म्हणाला, हे देवी! एकदा विष्वक्सेनाने विष्णु हाच श्रेष्ठ देव आहे अशी

कल्पना करून विष्णूची उग्र व दीर्घ तपश्चर्या पुष्कळ वर्षे केली. तपश्चर्या सफल झाली, तेव्हां विष्वक्सेन विष्णूचे ध्यान करीत होता, तरी लक्ष्मीसहित गणपतीचे दर्शन त्याला होऊं लागले. याप्रमाणे बराच वेळ झाल्यावर गणपति हेच सर्वश्रेष्ठ ब्रह्म आहे असा त्याचा निश्चय झाला आणि तो यावज्जन्म विष्णुसगतीने गणेशभक्ति करीत राहिला. गणपतीच्या अनुग्रहाने मात्र विष्णूला मधुकैटभाचा वध करता आला.

## श्रीदत्त योगींद्राचा उपदेश

**सूत** :– पूर्वी धर्मघ्न या नावाच्या पुरूषाला यज्ञधृग नावाचा एक राक्षसी मुलगा होता. त्याने शंकरआराधन करून 'मूर्त किंवा अमूर्त वस्तूपासून मला मरण नको' असा वर मागितला आणि मिळविला. पुढे सर्व त्रैलोक्यभर आपली सत्ता प्रस्थापित केल्यावर त्याने यज्ञकर्मांचा लोप करण्याचे व्रत स्वीकारले. यज्ञ द्रव्ये व याज्ञिक ब्राह्मण या सर्वांचा नाश करण्याचा त्याने सपाटा लावला. पुढे यज्ञपति व यज्ञभोक्ता जो विष्णु त्याने गणपतीची तपश्चर्या केली ह्या तपानुसार गणपतीनी शूर्पकर्णाचा अवतार घेऊन यज्ञधृगाचा नाश केला आणि स्वधर्माची स्थापना केली. पहा की, माती असलेल्या धान्यातील माती जशी आपण सुपाने नाहीशी करून धान्य स्वच्छ करतो, त्याप्रमाणे मायायुक्त जे आपण त्या आपली माया नाहीशी करून चित्तशुद्धि करण्यासाठी आपण शूर्पकर्णाची म्हणजे गणपतीची आराधना केली पाहिजे. कश्यप पुढें सांगतो : 'हे देवी! एकदा माघ मासामध्ये प्रयागास माघस्नान करण्याकरिता मोठी थोरली यात्रा जमली होती. त्यांत सर्व तीर्थे, सर्व देव व सर्व ब्राह्मण उपस्थित होते. त्यावेळी अवधूत मार्गाचा प्रकाशक दत्त

योगींद्रही तेथे उपस्थित होऊन ' ॐकार ' गणनाथाचे रमणीय स्तोत्र म्हणू लागला. त्याने सर्वांस ' गणेश ब्रह्म, सर्वव्यापी आहे ' हे तत्त्व, समजून सांगितले; आणि पुनः असे म्हणाला कीं, अन्नादि मूर्त पदार्थांत दिसणारे स्थूल ब्रह्म यांत अन्नरूपमय माया आहे, प्राणब्रह्मांत माया प्राणाकार आहे, मनोब्रह्मात माया मनोमय आहे, विज्ञानब्रह्मात माया विज्ञानमय आहे, आनंदब्रह्मांत आनंदरूप, चैतन्यब्रह्मांत चैतन्यरूप, बिंदुब्रह्मांत बिंदुरूप, सोहंब्रह्मांत सोहंप्रकाशित, बोधब्रह्मांत बोधाकार, विदेहब्रह्मांत देहशून्याकार, कर्मब्रह्मांत कर्माकार, ज्ञानब्रह्मांत ज्ञानाकार, समब्रह्मांत समरूप, सहजरूपांत सहजरूप, असद्ब्रह्मांत असन्माया, सद्ब्रह्मांत सदाकारमाया, सदसन्मयब्रह्मांत सदसद्रूपमाया, अव्यक्तब्रह्मांत अव्यक्तमाया, स्वसंवेद्यब्रह्मांत स्वानंदमाया. सारांश आपल्या समजुतीसाठी जे जे म्हणून नाव जीवाकडून ब्रह्माला प्राप्त होते त्या त्या नावाने दाखविल्या जाणाऱ्या पदार्थाने ( मायेने ) युक्त असे ते ते ब्रह्म असते. या सर्व वेदकथित ब्रह्मांचा जो स्वामी तो ब्रह्मणस्पति, नित्य स्वरूपामध्ये नित्य स्थिर असतो. हाच गणेश होय. यालाच गणाध्यक्ष म्हणतात. योगसाधन करून या गणेशाची प्राप्ति करून घेतली पाहिजे. तसेच चित्तपंचक, चित्तप्रकाशक चिंतामणि, सिद्धिबुद्धी, त्यांची स्वरूपें व कर्मे याचा उपदेश पूर्वी गणपतींनी तुह्मांस केला आहे, तो ध्यानांत ठेवून गणपतियोगाचा अभ्यास केलात तरच कल्याण होईल. गणेश हा सर्व ब्रह्मांची रचना करणारा पति आहे, म्हणून त्याला ब्रह्मणस्पति म्हणतात. हा शुद्ध आहे. येथे मायेचा मुळीच संबंध नाही. नारदाने दत्तयोगींद्राला विचारले, " तूं गणेशब्रह्मामध्ये आहेस, तदाकार आहेस, कारण ' तें तू आहेस ' हे जे ब्रह्मवाक्य याचा अनुभव तुला

आहे. हे जर खरे आहे तर, 'हा मी दत्त व हा गणेश हे द्वैत कोठून येते' जर तुझ्यामध्ये व गणेशामध्ये भिन्नभाव नाही तर तूं कोणाची उपासना करतोस? व भिन्नभाव असेल तर सर्व एकच आहे हे म्हणणे काय उपयोगाचे?"

दत्तयोगींद्र :– हा माझा नरसत्तायुक्त देह नामरूपादि विकाराला वश आहे म्हणून मी शुभाशुभ देहधर्म नित्य करतो. ब्रह्म तर सर्वत्र पसरलेले आहे. त्याची सत्ता सर्वत्र आहे. त्याच्या व्यतिरिक्त एक रेणू इतकीसुद्धां जागा रिकामी असत नाही. तथापि मायेच्या अनुकूल प्रतिकूल स्थितीने ब्रह्मसत्ता कमी जास्त भासत असते. पहा की, ब्रह्मणस्पति या शब्दाची सत्ता एका गणपतिमध्येच आहे, इतर देवांमध्ये नाही, म्हणुन अंतःकरणामध्ये प्रत्यक्ष असणाऱ्या विघ्नेशनामक ब्रह्माला जाणूनही ब्रह्मार्थी पुरूष ब्रह्माची आराधना करणार नाही असे कसे होईल? नारदा! जोपर्यंत देहादिमायेने विशिष्ट असा देहादि धारण करणारा जीव असतो तोपर्यंत त्याने गणेशेश्वराचे भजन केलेच पाहिजे. कर्म करणे हें देहाचे काम आहे व चिंतन करणे हें चित्ताचे (सर्व जीवांचे) काम आहे, म्हणून माझा देह व माझे चित्त ही उभयता गणपतीचे आराधन करतात. त्या उभयतांचा प्रकाशक जो आत्मा तो गजाननरूपच आहे, म्हणून त्याला गजाननाची भक्ति करण्याचे कांहीं कारण नाही. देह व चित्त ही उभयतां आपल्या प्रकाशकाचे भजन करतात. आत्मस्वरूपाने मी गणेशाहून भिन्न नाही; तथापि देहसाहाय्याने भक्षणादि क्रिया जशा मी देहपोषणाच्या गोष्टी आदराने करतो, तसेच

देहाच्या साहाय्याने देहप्रकाशक जो गणपति त्याचे भजनपूजन मीं स्वकल्याणार्थच करतो. अशा प्रकारचे गणेशयोगरहस्य ऐकून देवांनीं दत्ताची प्रेमाने स्तुति केली आणि ते स्वैरविहार करणारे योगी निघून गेल्यावर शिवप्रमुख देव व वसिष्ठप्रमुख ऋषि आपापल्या स्थानी गेले.

## दितीच्या पोटी गणेशावतार

सूत :– हे सर्व प्रवचन ऐकल्यावर दितीला गणपतीच्या ठिकाणी अत्यंत भक्ति उत्पन्न झाली. तिने आपला आसुरी स्वभाव सोडला. पुढे गणपतीची आराधना एकनिष्टपणाने तिने केली आणि केवळ भक्तिसुखार्थ त्यास प्रसन्न करून घेतले. गणपतींनींही तिला वर दिला की, 'मी तुझ्या उदरी येऊन तुझे मनोरथ पुरवीन.' पुढे एकदा माघ शुद्ध चतुर्थीला रविवारी नित्य नियमाप्रमाणे ती पूजा करीत असतां गणेशमूर्तीमधून अतितेजस्वी गणेशावतार प्रकट झाला. त्या तेजोगोलास पाहून दिति भयाभीत झाली व गणेशाचे स्मरण करू लागली. तेव्हां त्या सर्व मंगलदायक प्रभूने सौम्य रूप धारण केले आणि दिति व कश्यपाच्या ठिकाणी मोह उत्पन्न करून त्यांस अशी भ्रांति उत्पत्ति केली की, हा आपलाच पुत्र आहे. त्यांनी या बालकाचे जातसंस्कार मोठ्या प्रेमाने केले. मुद्गलाने सांगितले 'हा बालक देवांची स्वर्गामध्ये, मनुष्यांची पृथ्वीमध्ये व असुर नाग इत्यादिकांची पाताळामध्ये स्थापना करून चोवीस तत्वांची चालना करील. हे बाल दोन वर्षांचे झाले तेव्हा देवदानवामध्ये अति भयंकर युद्ध चालले होते. देवांनी राक्षसांचा पाठलाग पाताळापर्यंत करून त्यांस 'त्राहि त्राहि' करून सोडले होते. मग ते आपल्या आईला म्हणजे

दितीला शरण गेले. दितीने हे वृत्त गणपतीस सांगितले, तेंव्हा राक्षसांचा समूल संहार करण्याची इच्छा करणाऱ्या देवांवर परशु सोडून गणपतीने त्यांचा पराभव केला. पुढे ते देव स्वर्गात गेले तरी त्यांच्या मागचा परशु सुटेना आणि मरण चुकेना. तेंव्हा ते गणपतीस शरण गेले आणि त्यांनी असे मागणे मागितलें की, ' दैत्यांच्या त्रासातून आम्ही सुटूं असा आम्हाला वर दे.' चतुर्भुजाने देवांस स्वर्ग, राक्षसास पाताळ आणि मनुष्यास भूलोक देऊन सांगितले की, ' सर्वांनी आपापल्या स्वधर्माप्रमाणे चालावे. उन्मत्त होऊन जो कोणी आपली नियमित कक्षा सोडेल त्यास मी चतुर्भुज दंड करीन. देव सात्विक, तेंव्हा त्यांनी हा उपदेश मान्य केला. पण कांही दिवस गेल्यानंतर राक्षसांनी आपली मर्यादा सोडली. तेंव्हा दिति देवपक्षाकडे जाऊन गणपतीची अखंड भक्ति करूं लागली.

**सूत** :– सकाम भक्ति यथाविधि झाली तरी ती आसुरी फल उत्पन्न करते. विधियुक्त निष्काम कर्म हे नेहमी मोक्ष देणारे असते. मुनिहो ! हेंच तात्पर्य आपण सर्वांनी लक्षात ठेऊन धर्म, अर्थ, काम व मोक्ष साध्य करणारे जे गणेशचरित्र आहे त्याचे श्रवण एकनिष्ठ भक्तिने करावे असा दक्षास उपदेश करून मुद्गलमुनि विश्रांति घेण्याकरिता गेले.

[ इति विघ्नराजचरित्र समाप्त ]